सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी
विभागीय व जिल्हा क्रीडा संकुलास
(सात) अनुदान वितरीत करणेबाबत-
लेखाशिर्ष (२२०४-१८२७)

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पुमाप्र ३४२३/प्र.क्र .१५९ /क्रीयुसे-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३०.
दिनांक : १४ मार्च, २०२४

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामाजिक न्याय व क्रीडा विभाग क्रमांक:राक्रीधो-२००३/(प्र.क्र.११/०३)/क्रीयुसे-१, दिनांक २६ मार्च, २००३.
२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:राक्रीधो-२०१९/(प्र.क्र.९२)/क्रीयुसे-१, दिनांक २३ मार्च, २०२२.
३) क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र.विजिक्रीसं/निमा/निवि/२२-२३/का-९/३८६२, दिनांक ३० आक्टोंबर २०२३.
४) क्रीडा व युवक सेवा संचालनालय, पुणे यांचे पत्र क्र.विजिक्रीसं/निमा/निवि/२२-२३/का-९/४८१४, दिनांक ८ जानेवारी २०२४.

**प्रस्तावना :-**

राज्य क्रीडा धोरणांतर्गत राज्यामध्ये विभागीय/जिल्हा/तालुका स्तरावर क्रीडा संकुले उभारण्याची योजना संदर्भ क्र.१ येथील दिनांक २६ मार्च, २००३ च्या शासन निर्णयान्वये कार्यान्वित केलेली आहे. या योजनेंतर्गत अनुदान मर्यादेत संदर्भ क्र.२ येथील दिनांक २३ मार्च, २०२२ च्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आलेली आहे. त्यानुसार नव्याने मान्यता देण्यात येणाऱ्या तसेच अद्याप बांधकाम सुरु न झालेल्या क्रीडा संकुलांच्या अनुदान मर्यादेत पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात आली आहे:-

(१) अद्याप प्रशासकीय मान्यता न दिलेल्या अथवा प्रशासकीय मान्यता दिली आहे परंतु, अद्याप प्रत्यक्ष बांधकाम सुरु झालेले नाही, अशा क्रीडा संकुलांबाबत अनुदान मर्यादा खालीलप्रमाणे विहित करण्यात आली आहे:-

| क्रीडा संकुलाचा प्रकार | पूर्वीची अनुदान मर्यादा (रु.लाखात) | सुधारीत अनुदान मर्यादा (रु.लाखात) |
|---|---|---|
| तालुका क्रीडा संकुल | रु. १००.०० लक्ष | रु. ५००.०० लक्ष |
| जिल्हा क्रीडा संकुल | रु. ८००.०० लक्ष | रु.२५००.०० लक्ष |
| विभागीय क्रीडा संकुल | रु.२४००.०० लक्ष | रु.५०००.०० लक्ष |

(२) अंदाजपत्रकांना/सुधारीत प्रशासकीय मान्यता दिलेल्या व बांधकाम पूर्ण झालेल्या अथवा बांधकाम प्रगतीपथावर असलेल्या/अपूर्ण असलेल्या क्रीडा संकुलांबाबत अनुदान मर्यादा खालीलप्रमाणे राहील:-

| क्रीडा संकुलाचा प्रकार | पूर्वीची अनुदान मर्यादा (रु.लाखात) | सुधारीत अनुदान मर्यादा(रु.लाखात) |
|---|---|---|
| तालुका क्रीडा संकुल | रु. १००.०० लक्ष | रु. ३००.०० लक्ष |
| जिल्हा क्रीडा संकुल | रु. ८००.०० लक्ष | रु.१५००.०० लक्ष |
| विभागीय क्रीडा संकुल | रु.२४००.०० लक्ष | रु.३०००.०० लक्ष |

सदर दिनांक २३ मार्च, २०२२ रोजीच्या शासन निर्णयासोबत जोडलेल्या परिशिष्ट-अ, परिशिष्ट-ब व परिशिष्ट-क अन्वये विभागीय/जिल्हा/तालुका क्रीडा संकुलातील क्रीडा सुविधांबाबतचा टाईप प्लॅन विहित केलेला असून, परिशिष्ट-ड अन्वये सर्वसाधारण अटी व शर्ती विहित केल्या आहेत.

आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांनी संदर्भ क्र.३ आणि ४ येथील पत्रान्वये जिल्हा क्रीडा संकुल व विभागीय क्रीडा संकुलकरीता निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे. त्यानुषंगाने सन २०२३-२४ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२३-२४ या आर्थिक वर्षासाठी मागणी क्र.ई-३, (१०)(०२) क्रीडा प्रशिक्षण केंद्रांची आस्थापना (कार्यक्रम), ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर), संगणक क्रमांक २२०४-१८२७ या लेखाशिर्षाखाली सुधारित अदांजनुसार अर्थसंकल्पीत तरतूदीमधून खालील परिशिष्ट-अ नुसार रु.५०००.०० लक्ष (रु पाच हजार लक्ष) निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**परिशिष्ट-अ**

| अ.क्र | विभागीय /जिल्हा क्रीडा संकुलाचे नाव | मान्यताप्राप्त अंदाजपत्रकीय किंमत( रु.लाखात ) | यापूर्वी वितरीत केलेला निधी( रु.लाखांत ) | निधी वितरण मान्यता (रु लाखांत) |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | विभागीय क्रीडा संकुल, नागपूर | १६३२०.०० | ५१२०.०० | २८०.०० |
| २ | विभागीय क्रीडा संकुल, अमरावती | ५३३२.८१ | २४००.०० | ५००.०० |
| ३ | विभागीय क्रीडा संकुल, लातूर | ५४००.०० | ३४१.४० | २०००.०० |
| ४ | जिल्हा क्रीडा संकुल, नागपूर | ८५४३.६३ | १६१९.५२ | ६२०.०० |
| ५ | जिल्हा क्रीडा संकुल, चंद्रपूर | ७७१८.३० | २०००.०० | ३००.०० |
| ६ | जिल्हा क्रीडा संकुल, सोलापूर | २३६९.२२ | ८००.०० | ८००.०० |
| ७ | जिल्हा क्रीडा संकुल, रत्नागिरी | २७५६.०० | ११४५.०० | ५००.०० |
| | | | एकुण रक्कम | ५०००.०० |

२. वरीलप्रमाणे वितरीत केलेला निधी आहरित करुन आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या अधिनस्त ठेवण्यास मंजूरी देण्यात येत आहे. मंजूर निधी खालील अटी/शर्तीच्या अधिन राहून बांधकामाच्या प्रगतीनुसार वितरीत करण्यात यावा.

I. उपरोक्त निधी राज्य क्रीडा विकास समितीच्या आगामी बैठकीतील मान्यतेच्या अधीन राहून मंजूर करण्यात येत आहे.

II. संबंधित जिल्हा क्रीडा संकुलाचे बांधकाम आराखडे व सुधारीत अंदाजपत्रकास आवश्यकतेनुसार विहित प्राधिकाऱ्यांची तसेच, राज्य क्रीडा विकास समितीची कार्योत्तर मान्यता घेण्यात यावी.

III. उपरोक्त निधी आवश्यकतेनुसार व मान्य निकषानुसार खर्च करण्यात यावा. ज्यावेळेस निधी प्रत्यक्ष खर्च करावयाचा असेल, त्याचवेळी आहरीत करण्यात यावा. शासन लेख्याबाहेरील बँक खात्यात हा निधी ठेवण्यात येऊ नये.

IV. राज्य शासनामार्फत वेळोवेळी निर्गमित केलेली वित्तविषयक विविध परिपत्रके/ आदेश/नियम/ शासन निर्णय व वित्तीय नियमावली यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करुनच वितरीत निधीचा विनियोग करण्यात यावा.

V. सदरचा निधी ज्या प्रयोजनाकरिता / बाबींकरिता मंजूर केला आहे, त्याच बाबींसाठी खर्च करण्यात यावा. खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित वेळेत सादर करावे.

३. उपरोक्त बाबीवरील खर्च “मागणी क्रमांक ई-३, २२०४, क्रीडा व युवक सेवा, १०४, क्रीडा व खेळ, (१६) क्रीडा संकुल, (१६) (०२) क्रीडा संकुलाची स्थापना (कार्यक्रम), ३१, सहाय्यक अनुदाने (वेतनेतर),” संगणक क्रमांक (२२०४ १८२७), या लेखाशीर्षाखाली आर्थिक वर्ष २०२३-२४ करीता उपलब्ध असलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

४. शासन निर्णय, वित्त विभाग, दिनांक १२.०४.२०२३ मधील अटी/शर्तीनुसार निधी वितरणाची कार्यवाही करावी.

५. उपरोक्त मंजूर निधी कोषागारातून आहरित करण्याकरीता संबंधीत क्रीडा संकुलाच्या नावासमोर दर्शविण्यात आलेली रक्कम कोषागारातून आहरीत करण्याकरीता संबंधीत जिल्हा क्रीडा अधिकारी /क्रीडा व युवक सेवा ,उपसंचालक /लेखाधिकारी पुणे ,क्रीडा व युवक सेवा संचालनालय , यांना आहरण व संवितरण अधिकारी व आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, पुणे यांना नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे .

६. सदर शासन निर्णय, नियोजन विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.४२/१४७१, दिनांक २४.०१.२०२४ व वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१६०/व्यय-५, दिनांक १२.२.२०२४ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०२४०३१४२०२११२६८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RANSING ANANDRAO DERE

Digitally signed by RANSING ANANDRAO DERE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SCHOOL EDUCATION AND SPORTS DEPARTMENT, 2.5.4.20=9651a3c25d5e1f106e47059f72760ff520f9b00f67c3e9186e40ed4bd4fbaee6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=41EC78BC14804BABDC24C7FD31BA9FBF63804F499D4335774E27423E40136397, cn=RANSING ANANDRAO DERE
Date: 2024.03.14 20:31:08 +05'30'

**( रणसिंग डेरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
४. मा.उपमुख्यमंत्री(वित्त व नियोजन) यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई
५. मा.मंत्री ( क्रीडा व युवक कल्याण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा.विरोधी पक्षनेता (विधानसभा / विधानपरिषद) , मुंबई.
७. मा.राज्य मंत्री ( क्रीडा व युवक कल्याण ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. सर्व विधानसभा / विधानपरिषद सदस्य.
९. अपर मुख्य सचिव,क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.आयुक्त, क्रीडा व युवक सेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
११.संबंधित जिल्हाधिकारी, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१२.महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), १ / २, महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर.
१३.महालेखापाल (लेखा परिक्षा), १ / २, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१४.संबंधित उप संचालक, क्रीडा व युवक सेवा, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१५.संबंधित अधिदान व लेखाधिकारी, (क्रीडा संचालनालयामार्फत)
१६.संबंधित जिल्हा क्रीडा अधिकारी, (क्रीडा संचालनामार्फत)
१७.संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१८. संबंधित वरिष्ठ कोषागार अधिकारी, ( क्रीडा संचालनालयामार्फत)
१९.वित्त विभाग (व्यय-५)/अर्थ-८/नियोजन विभाग (का.१४७१), मंत्रालय, मुंबई,
२०.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई,
२१. निवड नस्ती (क्रीयुसे-१).